प्रतिनियुक्तीवरील सेवा प्रत्यावर्तित करणेबाबत
श्री.अर्जुन वाघमोडे, कक्ष अधिकारी

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र. कअनि-१११९/प्र.क्र.९०/प्रशा-२ (१४ब)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ०६ मार्च, २०२५

**संदर्भ:-** १) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२,दि.१७.१२.२०१६
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का. १२, दि.१६.०२.२०१८
३) सा.प्र.वि. शासन आदेश समक्रमांक दि.३१.०१.२०२०, दि.२२.०२.२०२१, दि.०२.०३.२०२२ व दि.०९.०२.२०२४

**शासन आदेश**

श्री.अर्जुन वाघमोडे, कक्ष अधिकारी, गृह विभाग यांची संदर्भ क्र.३ येथील दिनांक ३१.०१.२०२० च्या आदेशान्वये कृषि व पदुम विभागाच्या अधिपत्याखालील बाळासाहेब ठाकरे (महाराष्ट्र राज्य) कृषी व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन (SMART) प्रकल्पांतर्गत प्रकल्प समन्वय व व्यवस्थापन कक्ष, पुणे या कार्यालयातील "**प्रशासकीय अधिकारी**" पदावर प्रथमत: ०१ वर्ष कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्री.वाघमोडे हे सदर कार्यालयात दिनांक १०.०२.२०२० पासून प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. त्यानंतर श्री.वाघमोडे यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीस वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली असून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी दिनांक ०९.०२.२०२५ रोजी संपुष्टात आला आहे. तथापि, श्री.वाघमोडे हे प्रतिनियुक्तीच्या पदावरुन अद्याप मूळ विभागात म्हणजेच गृह विभागात रुजू झाले नाहीत.

२. त्यामुळे साप्रवि, शासन निर्णय, दिनांक १६.०२.२०१८ मधील अ.क्र.१ (क) मध्ये नमूद तरतूदीनुसार श्री.अर्जुन वाघमोडे, कक्ष अधिकारी, गृह विभाग यांच्या कृषि व पदुम विभागाच्या अधिपत्याखालील बाळासाहेब ठाकरे (महाराष्ट्र राज्य) कृषी व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन (SMART) प्रकल्पांतर्गत प्रकल्प समन्वय व व्यवस्थापन कक्ष, पुणे या कार्यालयातील "**प्रशासकीय अधिकारी**" पदावर करण्यात आलेली प्रतिनियुक्ती संपुष्टात आणून, त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागाकडे म्हणजेच गृह विभागाकडे **दिनांक ०६.०३.२०२५ (म.नं.)** पासून प्रत्यावर्तित करण्यात येत आहेत.

३. श्री.अर्जुन वाघमोडे, कक्ष अधिकारी यांनी गृह विभागात **दिनांक ०७.०३.२०२५ (म.पू.)** रोजी रुजू व्हावे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३०६१८०१०२०२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.03.06 18:03:12 +05'30'

(ग.स.परब)
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.अर्जुन वाघमोडे, प्रशासकीय अधिकारी, बाळासाहेब ठाकरे (महाराष्ट्र राज्य) कृषी व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन (SMART) प्रकल्पांतर्गत प्रकल्प समन्वय व व्यवस्थापन कक्ष, पुणे

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अमुस/प्रधान सचिव/सचिव, गृह विभाग आणि कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सह सचिव/उप सचिव (का-८अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रकल्प संचालक, बाळासाहेब ठाकरे (महाराष्ट्र राज्य) कृषी व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन (SMART) प्रकल्पांतर्गत प्रकल्प समन्वय व व्यवस्थापन कक्ष, पुणे
६) निवडनस्ती/प्रशा-२